**कोषागाराकडे दुबार मागणी देयकेसादर**
**होण्यावर प्रतिबंधात्मक उपाययोजना**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र.:मआख १०९९/प्रक्र ३६/९९/विनियम**
**मंत्रालय, मुंबई- ४०००३२**
**दिनांक :' २८ ऑक्टोबर, २००४**

**परिपत्रक :** शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, शासकीय अधिका-यांची /कर्मचा-यांची किंवा खाजगी मागणीदारांना शासनाकडून देय असलेल्या विविध मागण्यांची देयके आहरण व संवितरण अधिका-यांकडून अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, कोषागार व उपकोषागारांकडे रकमा काढण्यासाठी दुबार सादर केली जात असल्याचे निदर्शनास आले आहे. ही बाब मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील नियम-५८ अनुसार अत्यंत गंभीर स्वरुपाची आहे. अशा दुबार देयकांना आळा बसावा म्हणून पुढील प्रमाणे कार्यवाही अंमलात आणण्यात यावी.

(१) प्रत्येक कार्यालयाच्या रोख शाखेत आहरण व संवितरण अधिका-याने या शासन परिपत्रकाच्या परिशिष्टामध्ये विहित केल्याप्रमाणे **" दुबार देयके प्रतिबंध नोंदवही"** ठेवावी.

(२) वेतन व भत्त्याची नोंद दुबार देयके प्रतिबंध नोंदवहीत घेण्यात येऊ नये. यासाठी "पुरवणी वेतन बिलावर काढलेले वेतन व भत्ते यांची दुय्यम नोंदवही "नमुना सर्वसा २१३ म विहित केलेली आहे. त्यामध्ये या नोंदी घेण्यात याव्यात.

(३) दुबार देयक प्रतिबंध नोंदवहीतील स्तंभ-३ मध्ये देयकाबाबत सविस्तर नोंद घेण्यात यावी.

उदा- (i) प्रवास भत्त्याचे देयक असल्यास प्रवासाच्या सुरुवातीचा व समाप्तीचा दिनांक, प्रवास भत्ता अग्रिमाचा आदेश क्रमांक व दिनांक.

(ii) पुरवठ्याचे देयक असल्यास वस्तू /सेवा पुरवठ्याचा दिनांक, बिल क्रमांक व दिनांक, कार्यालयीन आदेश क्रमांक व दिनांक यांची नोंद घेण्यात यावी.

(४) दुबार देयक प्रतिबंध नोंदवहीत आहरण व संवितरण अधिका-याने स्तंभ- ३ खालील नोंदीसंबंधिची देयके यापूर्वी पारित झालेली नाहीत, याची खात्री करुन स्तंभ-६ मध्ये स्वाक्षरी करावी. तसेच प्रत्येक देयकाच्या पृष्ठावर पुढील प्रमाणे प्रमाणपत्र नोंदवून अ. व ले. कार्यालय, कोषागर व उपकोषागाराकडे देयक सादर करावे.

> "दुबार देयक" प्रतिबंध नोंदवही तपासणीच्या आधारे प्रमाणित करण्यात येते की या देयकात नमूद केलेल्या अधिका-यांचे* / कर्मचा-यांचे* / पुरवठादाराचे*तसेच त्यात नमूद केलेल्या बाबींचे*/ कालावधीचे*देयक यापूर्वी अधिदान व लेखा कार्यालय*/ कोषागार* / उप कोषागार* येथे सादर करण्यात आले नव्हते.
>
> आहरण व संवितरण अधिकारी

"(*अनावश्यक मजकूर खोडावा)"

रोटा/एच-722(12500+15-10-04)-1

(५) दुबार देयक प्रतिबंध नोंदवही वर्षनिहाय व कर्मचा-यांच्या / संस्थेच्या इंग्रजी वर्णाक्षरानुसार ठेवण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( श.मा.भुते )
**अवर सचिव, वित्त विभाग**

सहपत्र परिशिष्ट
प्रति

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव
१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
* १७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई
* १८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* १९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* २०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१
२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. सर्व उप कोषागार अधिकारी
२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग( कार्यासन -हाऊसिंग सेल ,१९ -सी ),मंत्रालय, मुंबई:३२
२८. सर्व विभागीय आयुक्त
२९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३०. सर्व जिल्हाधिकारी
३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
३३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
३४. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१
३५. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३६. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग

* पत्राद्वारे.

**शासन परिपत्रक क्र.मआख-१०९९/प्र.क्र.३६/९९/विनियम, दि.२८ ऑक्टोबर, २००४ सोबतचे परिशिष्ट )**

## दुबार देयक प्रतिबंध नोंदवही

( इंग्रजी वर्णाक्षरानुसार व वर्षनिहाय )

| मागणीदाराचे नांव (शासकीय अधिकारी /कर्मचारी यांचे नाव व पदनाम / कार्यालयाचे / संस्थेचे नांव व पत्ता | मागणीचे वर्णन | कालावधी (आवश्यक त्या तपशीला सह ) | देयकाची रक्कम<br>मुळ रु.-----<br>निव्वळ रु.--- | देयक क्रमांक..<br>दिनांक<br>प्रमाणक क्र.<br>दिनांक | आहरण व संवितरण अधिकाऱ्याची स्वाक्षरी (या संदर्भातील व या कालावधीचे देयक प्रतिबंध नोंदवही मध्ये यापूर्वी नोंद होऊन पारित झालेले नाही याची खात्री केल्याबाबत आहरण व संवितरण अधिकाऱ्याची स्वाक्षरी) |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |

---